

# शूरवीर

लेखक: केन मॉचिझुकी

चित्रे: डॉम ली

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



माझे वडील रोज सकाळी मला कारमधून शाळेत नेऊन सोडत. पण त्यांनी मला शाळेत सोडायला येऊ नये, असे मला वाटे. याचे कारण, पायी चालत शाळेत जाणारी मुले नेहमी माझ्याकडे टक लावून बघत. काही मुले तर माझ्याकडे बोट दाखवत तर काही त्यांचे बोट बंदुकीसारखे दाखवून माझ्यावर नेम धरत.

“सगळे आपल्याला वाईट का समजतात, बाबा?” मी वडिलांना विचारले.

“तसं फक्त सिनेमात दाखवतातं,” ते उत्तरले.

तरीही मी कधीकधी त्यांना शाळेपासून दूर अंतरावर गाडी थांबवून उतरण्यासाठी राजी करत असे.

शाळा सुटल्यावर मी माझ्या मित्रांना भेटत असे. मी त्यांना फुटबॉल खेळायला सांगत असे. पण त्यांना लढाई-लढाई खेळायला आवडत असे. कारण लढायला त्यांच्याकडे एक शत्रू होता, मी. टोरीकडे अनेक प्रकारच्या खेळण्यातील बंदुका होत्या. या बंदुका रस्त्याच्या टोकाला असलेल्या जंगलात घेऊन जाण्यासाठी *जॅक* आणि *रेग्गी* त्याची मदत करत. तिथेच मी त्यांना भेटायचो.

*जॅक* कधीकधी आपल्या वडिलांची एखादी वस्तू सोबत आणत असे. त्याच्या वडिलांचे युद्धातील फोटो किंवा त्यांना मिळालेली पदके आणून तो आम्हाला दाखवत असे. “ते एक शूर योद्धा होते,” जॅक म्हणत असे. मग तो मला म्हणत असे की लढाईच्या खेळात ते मलाच शत्रू बनवतात, कारण मी शत्रुदेशातील लोकांसारखा दिसतो.



“चल पळ, *डोनी*,” जॅकने आदेश दिला. “तू वाईट माणूस आहेस आणि आम्ही तुझा पाठलाग करून तुला पकडणार आहोत.”

“नाही, मी वाईट नाही,” मी विरोध केला. “माझे वडील आपल्या सैन्यात होते. ते इटली आणि फ्रान्समधले लढले होते आणि माझे काका कोरियात लढले होते.“

“अशक्य!” जॅक म्हणाला.

“तुझे वडील आणि काका आमच्या सैन्यात कसे असतील?” टोरीने विचारले.

“खरंय,” रेग्गीने मान्य केले, “आपल्या सैन्यात तुझ्यासारखं दिसणारं कुणीच नव्हतं. तू सिद्ध करून दाखव नाहीतर पळायला सुरुवात कर, डोनी.”

मी सिद्ध करू शकलो नाही, त्यामुळे मला पुन्हा वाईट माणूस बनावे लागले. मला या गोष्टीचा तिरस्कार वाटे. पण मित्र गमावण्यापेक्षा खेळात वाईट माणूस बनणे जास्त ठीक वाटायचे मला.



पण मला माहीत होते की माझे वडील एक शूर योद्धा होते, हे सिद्ध करायला त्यांच्या युद्धाच्या कहाण्या पुरेशा होत्या. मी अनेकदा गॅस स्टेशनवर त्यांना आपल्या सैन्यातील मित्रांशी गप्पा मारताना ऐकले होते. मी कित्येकवेळा त्यांना युद्धातील कहाण्या सांगण्याची विनंती केली, पण दरवेळी त्यांनी ते टाळले.

एकदा, मी बाबांच्या लष्करी टोपीतील पदक काढण्याचा प्रयत्न केला. ते पदक मला माझ्या मित्रांना दाखवायचे होते. त्यासाठी मला बाबांचा खूप ओरडा खावा लागला. मी त्यांना सांगितले की ते एक शूर योद्धा होते, हे सिद्ध करण्यासाठी मी ते पदक काढत होतो. यावर ते म्हणाले, “तुम्ही मुलांनी युद्धबिद्ध सोडून इतर कुठलातरी खेळ खेळायला हवा.”





यशकाकांचेही असेच होते. ते आमच्यासोबत स्टेशनमध्ये बसत, कॉफी पित. पण ते नेहमी शांत असत आणि कोरियाबद्दल जास्त बोलत नसत. एकदा मी त्यांना त्याबद्दल विचारले.

“खरे शूर बढाया मारत नाहीत,” ते म्हणाले. “ते फक्त त्यांचं कर्तव्य पार पाडतात.”

ते आमच्या घरी येत तेव्हा मी टिव्हीवर युद्धाचा सिनेमा बघत बसलेलो दिसलो किंवा व्हिएतनाममध्ये चाललेल्या युद्धाचे बातमीपत्र पाहात असलो तर त्यांना आवडत नसे.

खेळात वाईट माणूस बनायचा मला खूपच तिटकारा आला. शेवटी मी ठरवले की मित्रांपासून लपून राहायचे, त्यांना मी सापडूच शकणार नाही अशा जागी. मी गुपचुप जंगलात शिरलो. झांडांच्या अधूनमधून सूर्याची किरणे जमिनीवर पडली होती. आजवर मी जंगलात एवढ्या आतपर्यंत गेलो नव्हतो. सूर्याचा प्रकाश निस्तेज होत गेला आणि जंगलात अंधार होत गेला. माझे बूट खाली पडलेल्या काटक्यांना चिरडत असल्याचा आवाजच फक्त ऐकू येत होता.

मग झुडपांमध्ये काही सळसळ झाली. हा आवाज टोरी, जॅक किंवा रेग्गीचा नव्हता. मला भीती वाटू लागली. आता परतायची वाट शोधली पाहिजे, हे उमगले. पण मी एकाच जागेवर गोल-गोल फिरत राहिलो तर काय? मी एका मोठ्या खडकावर बसलो आणि विचार करू लागलो. कारण घाबरलो असतो तर परिस्थिती चिघळली असती. शूर माणसे घाबरत नसतात. ते त्यांचे कर्तव्य करत असतात.



कॅप्टन डोनी ओकाडा म्हणून, मी माझ्या सैनिकांना मोठ्या विश्वासाने सावकाशपणे, निर्भयतेने, गर्द-अंधाऱ्या जंगलातून घेऊन जाऊ लागलो. काही अंतर पार केल्यावर, सूर्यप्रकाशाचे दर्शन झाले. मी एका मोकळ्या जागी पोहोचलो. सूर्याचे दर्शन झाल्यावर मला खूप बरे वाटले.



“पाव्!”

“आम्ही तुला शोधून काढलं, डोनी!”

जॅक आणि रेग्गी त्या मोकळ्या जागेतून माझ्याकडे धावले. मी आपली खेळण्यातील बंदूक फेकून दिली आणि जंगलाच्या दिशेने पळालो. धावताधावता वाटेत एके ठिकाणी मी अडखळून पडलो आणि फरफटत गेलो. परत उठून मी शक्य तितक्या वेगात धावू लागलो.



मुले माझा पाठलाग करू लागली. मी बाबांच्या गॅस स्टेशनवर पोहोचलो, तेव्हा ते तिथेही आले.

“ठो-ठो-ठो-ठो! पाव्! पाव्! पाव्! ठार झालास तू डोनी!”

बाबा आणि काका एका कारची दुरुस्ती करत होते. योशकाका कारच्या खालून लगेच बाहेर आले. त्यांना खूप राग आला होता. बाबासुद्धा उठून उभे राहिले आणि काय झाले ते पाहू लागले.



“मी वाईट माणूस नाही!” मी ओरडलो आणि बाबांकडे पळालो. बाबांनी त्यांचा हात माझ्या खांद्यावर ठेवला. “

“चला मुलांनो,” ते म्हणाले. “पुरे झाला तुमचा लढाईचा खेळ.”

योशकाकाने खेळण्यातील बंदुकीकडे टक लावून पाहिले आणि त्यांचा राग जास्तच वाढला.

“अरे, डोनी, तू तर खेळाची मजाच घालवून टाकलीस!” रेग्गी म्हणाला.



मी वर मान करून बाबांकडे पाहिले. त्यांना माझी बाजू समजावून सांगताना मी डोळ्यांतील अश्रू रोखू शकलो नाही.

“बघा बाबा, तुम्ही मला युद्धाच्या कहाण्या सांगणार नाही का? मी त्यांना सिद्ध करून दाखवू शकणार नाही का? आपण नाही त्यांच्यासारखं शूरवीर होऊ शकत!”

बाबांनी योशकाकांकडे पाहिले. काकांनी क्षणभर विचार केला आणि आपली मान हलवून होकार दिला.

“उद्या आम्ही तुला शाळेतून न्यायला येतो,” बाबा म्हणाले.





पुढल्या दिवशी शाळेत मुले मला “भेकड” आणि “बाबांचा बच्चा” असे चिडवू लागले. शेवटी, शाळेची घंटा वाजली आणि मी दाराकडे चालू लागलो. माझे वर्गमित्र एकत्रच माझ्या मागेमागे येऊ लागले. मग त्यांनी त्यांची बोटे बंदुकीसारखी करून माझ्यावर रोखली.

“ठो-ठो-ठो-ठो! पाव्! पाव्!”

शाळेत त्यांनी सर्वत्र माझा पाठलाग केला. काल ठरवल्यानुसार, बाबा आणि योशकाका येतील अशी मला आशा वाटत होती.

शाळेबाहेर, सगळी मुले उत्तेजित झाली होती. ते रस्त्याकडे बोट दाखवत होते. मी त्या दिशेला पाहिले. माझा माझ्या डोळ्यांवर विश्वासच बसेना.

आपल्या वर्कशॉपमधील कपडे घालून माझे बाबा त्यांच्या ट्रकजवळ उभे होते. पण त्यांनी उन्हाचा चष्मा आणि लष्करी टोपीसुद्धा घातली होती. टोपीवर पदके लावलेली होती – मी पाहिली होती त्यापेक्षा जास्त पदके. योश काकांना बघून तर मी अवाकच झालो. त्यांनी उन्हाच्या चष्म्यासोबत आपला ऑफीसरचा गणवेश आणि हॅट घातली होती. त्यांच्या छातीवर लावलेल्या फिती खुल्या क्रेयॉन खोक्याच्या वरच्या भागासारख्या दिसत होत्या. त्यांची पदके आणि पितळेची बटणे उन्हात चमकत होती.



योशकाकाने माझा फुटबॉल आपल्या हातात पकडून ठेवला होता. मी मुलांच्या गर्दीत दिसल्यावर ते मोठ्याने ओरडले, “हे, डोनी, पकड!” त्यांनी बॉल अचूक फिरवून फेकला.





मला वाटले होते की बाबा आणि काका मला गाडीतून घरी न्यायला आले होते. तिथे काही वेळ थांबून त्यांनी मी ठीक आहे याची खात्री करून घेतली. मग ते तिथून परत गेले. फुटबॉल हातात धरून मी तिथेच स्तब्ध उभा राहिलो.

“कोणकोण खेळणार?” मी विचारले.

जॅक, रेग्गी, टोरी आणि इतर काही मुले खेळायला उत्सुक होती. आम्ही सगळे मैदानाकडे पळालो.

यावेळी मुले माझा पाठलाग करण्याऐवजी माझ्यासोबत येत होती.

समाप्त

## लेखकाचे मनोगत

अमेरिकेतील सुमारे 50,000 नागरिक, आशिया आणि प्रशांत महासागरातील बेटांचे मूळ रहिवासी होते. त्यांनी दुसऱ्या महायुद्धात अमेरिकी सैन्यात काम केले होते. यांतील सर्वात उल्लेखनीय होती, 442 रेजिमेंटल कॉम्बॅट टीम. ही अमेरिकी सैन्याची अशी पलटण होती ज्यातील सर्व सैनिकांचे मूळ जपानी होते. या पलटणीने युरोपातील कित्येक युद्धांमध्ये भाग घेतला होता. त्यांना अनेक शौर्यपदकेही मिळाली.

Printed in Hong Kong

LEE & LOW BOOKS Inc.
95 Madison Avenue
New York, NY 10016